**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती) उद्योजकांसाठी राबविण्यात येणाऱ्या विशेष सामूहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत प्रोत्साहने अदा करण्यासाठी निधी वितरीत करणे बाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१७/प्र.क्र.६२/उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २७ मार्च, २०१७

वाचा:- १) शासन निर्णय,उ.ऊ.व का.वि.क्र.साप्रोयो-२०१५/प्र.क्र.१३३/उद्योग-८, दि.११/२/२०१६,
२) शासन निर्णय, उ.ऊ.व का.वि. क्र. साप्रोयो-१७०७/प्र.क्र.१७/उद्योग-८, दि.२५/५/२००७,
३) शासन निर्णय क्र.साप्रोयो-२०१७/प्र.क्र.३९/उ-८, दि. ०६/०३/२०१७
४) शासन निर्णय क्र.साप्रोयो-२०१७/प्र.क्र.६२/उ-८, दि. १०/०३/२०१७
५) शासन शुध्दीपत्रक क्र.साप्रोयो-२०१७/प्र.क्र.६२/उ-८, दि. १८/०३/२०१७
६) शासन निर्णय,उ.ऊ.व का.वि.क्र.पूरक-२००९/२००९-२०१०/(९५४२),प्रशासन-१,दि.३०/६/२००९
७) शासन निर्णय,उ.ऊ.व का.वि.क्र.बीयुडी-२०१५/२०१५-२०१६/९२४/, प्रशासन-१, दि. ९/४/२०१५
८) शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ , दिनांक २०/०४/२०१६.
९) शासननिर्णय,उ.ऊ.वका.वि.क्र.बीयुडी-२०१५/२०१५-२०१६/९२४/,प्रशासन-१, दि.३०/४/२०१५
१०) शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ , दिनांक ६/२/२०१६.
११) उद्योग संचालनालयाची पत्र दि. २२/०३/२०१७, व दि. २५/०३/२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील उद्योगांना दुर्गम व अविकसित क्षेत्रामध्ये प्रसार व चालना देण्यासाठी राज्य शासनामार्फत या भागात स्थापन होणाऱ्या नवीन/विस्तारीत उद्योगांना प्रोत्साहन देण्याकरीता सन १९६४ पासून सामुहिक प्रोत्साहन योजना राबविण्यात येत आहे. सदर धोरणास अनुसरुन भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ व्या जयंतीनिमित्त राज्यातील अनुसूचित जाती/जमाती उद्योजकांना उत्तेजन देऊन त्यांना स्वयंपूर्ण व आर्थिकदृष्टया स्वावलंबी करण्यासाठी शासन निर्णय दिनांक ११/०२/२०१६ अन्वये विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना राबविण्यात येत आहे. त्यानुसार उद्योग संचालनालयाने अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती उद्योजकांसाठी राबविण्यात येत असलेल्या भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतंर्गत विशेष भांडवली अनुदान/विद्युत कर परतावा अनुदान अदा करण्याबाबत विभागीय कार्यालय/जिल्हा उद्योग केंद्रांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांनुसार **एकूण रु.१,१६,७४०००/-** इतकी रक्कम मंजूर करण्याबाबत सादर केलेल्या प्रस्तावांना मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ व्या जयंतीनिमित्त राज्यातील अनुसूचित जाती/जमाती उद्योजकांना उत्तेजन देऊन त्यांना स्वयंपूर्ण व आर्थिकदृष्टया स्वावलंबी करण्यासाठी शासन निर्णय दिनांक १०/०२/२०१६ अन्वये विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना राबविण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार प्रस्तुत योजनकरीता आवश्यक असलेला निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग तसेच आदिवासी विकास विभाग यांचेकडून २:१ या प्रमाणात प्राप्त होणाऱ्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात येणार आहे. त्यानुसार सन २०१६-१७ करीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून मागणी क्र. के-७, मुख्यलेखाशिर्ष २८५२ उद्योग ८० सर्वसाधारण ७८९, अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०१) अनुसूचित जातीच्या

उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रोत्साहन योजना (योजनांतर्गत) (२८५२ ए ००४) अंतर्गत एकूण रु.५६.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात येऊन त्यापैकी ८० टक्के म्हणजे रु.४४.८० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

२. सदर निधीमधून उद्योग संचालनालयाच्या विविध प्रस्तावानुसार आतापर्यंत मंजुर केलेले/ मान्यतेसाठी सादर केलेले प्रस्तावांची एकूण रक्कम रु. ४३.३८८०२५०/- कोटी इतका निधी वगळता रु.१.४११९७५० कोटी इतका निधी शिल्लक आहे.

सदर उपलब्ध निधीमधून उद्योग संचालनालयाकडून प्रस्तुत योजनेतंर्गत खालीलप्रमाणे प्रस्ताव क्र. १ व २ येथे नमूद एकूण **रु.१,१६,७४०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सोळा लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त)** इतक्या रकमेचे भांडवली अनुदान मंजूर करण्याबाबत सादर करण्यात आलेल्या खालील प्रस्तावांस मान्यता देण्यात येत आहे :-

**प्रस्ताव क्र :- १**

| दि. २२/०३/२०१७ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **यादी तील दाव्यांची संख्या** | **विभाग व जिल्हा** | **अनुदानाचा प्रकार** | **अनुशेष कालावधी** | **रक्कम** |
| १ | २ | कोकण विभाग:ठाणे | भांडवल अनुदान | ३१/०३/२०१७ | रु.७,३१,०००/- |
| २ | १ | नाशिक विभाग:अहमदनगर | | | रु.१६,८६,०००/- |
| ३ | २ | पुणे विभाग:कोल्हापूर | | | रु.२४,७९,०००/- |
| | **१४** | **एकूण** | | | **रु.४८,९६,०००/-** |

**प्रस्ताव क्र :- २**

| दि. २५/०३/२०१७ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **नोंदवहीतील क्रमांक** | **यादी तील दाव्यांची संख्या** | **विभाग व जिल्हा** | **अनुदानाचा प्रकार** | **अनुशेष कालावधी** | **रक्कम** |
| १ | ७ | २ | कोकण विभाग:सिंधूदूर्ग, रायगड | भांडवली अनुदान | ३१/०३/२०१७ | रु.२९,१७,०००/- |
| २ | | २ | नाशिक विभाग:नाशिक | | | रु.२३,६१,०००/- |
| ३ | | १ | पुणे विभाग:पुणे | | | रु.१५,००,०००/- |
| **घटक - ५** | | **५** | **एकूण** | | | **रु.६७,७८,०००/-** |
| | | | **प्रस्ताव क्र . १ व २ एकूण रक्कम** | रु.४८,९६,०००+६७,७८,००० = **रु. १,१६,७४,०००/-** | | |

३. **वरीलप्रमाणे मंजूर दाव्यांच्या रकमा अदा करण्याकरीता होणारा खर्च रु. १,१६,७४,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सोळा लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) मागणी क्र. के-७, मुख्यलेखाशिर्ष २८५२ उद्योग - ८० सर्वसाधारण ७८९, अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०१) अनुसूचित जातीच्या उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रोत्साहन योजना (योजनांतर्गत) (२८५२ ए ००४) या लेखाशीर्षाखाली मार्च ,२०१७ च्या कॅश फ्लोमध्ये मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.**

४. वरीलप्रमाणे अनुदानाचे वितरण करतांना शासन पत्र क्र.आयडीएल-१०९८/(२००)/उद्योग-८, दि.२९/५/१९९८ व पत्र क्र.१०९८/(४२९)/उद्योग-८, दि.१५/१०/१९९८ च्या पत्रान्वये देण्यात आलेल्या सूचना तसेच सामूहिक प्रोत्साहन योजनेतील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व विकास आयुक्त (उद्योग), मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखालपाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरीत झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्याची राहील.

६. शासन असेही आदेश देत आहे की, संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये दिलेल्या निदेशांनुसार सदर लेखाशिर्षाखाली झालेल्या खर्चाचा ताळमेळ कोषागारातील लेख्यांबरोबर घालण्याची जबाबदारी सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यावर टाकण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त खर्चाचा ताळमेळ कोषागारातील लेख्यांबरोबर घालण्याची कार्यवाही सहायक संचालक (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी विनाविलंब करावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०/०४/२०१६ ला अनुलक्षून सदर शासन निर्णयातील तपासणी सूचीतील लागू अटींची पूर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१४४७३८९०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, serialNumber=d337930b14433dc62c0154af2bbc60bb5a6edcaa66b7f34596c50a27eb0f6333, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2017.03.27 14:49:25 +05'30'

**(संजय इंगळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर,
४. सहायक व्यवस्थापक, पब्लिक अकाउन्टस डिपार्टमेंट( स्टेट डेबिट सेक्शन), रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, मुंबई
५. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२,
६. सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण मर्यादित, मुंबई (द्वारा-व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि.,मुंबई)
९. अवर सचिव ( र. व का. ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-३२,
१०. रोख शाखा, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-१४/कराधान-१), मंत्रालय, मुंबई-३२,
१२. कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२,
१३. निवड नस्ती ( उद्योग-८ ).